# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक-पोप्रमा-०२१७/प्र.क्र.१३३/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक २ ऑगस्ट २०१७.

**विषय** :- पोलीस ठाणे, मंद्रुप, ता. पश्चिम सोलापूर, जि. सोलापूर, येथील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्याकरिता निवासी बराकी बांधण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ सोलापूर-ग्रा.-मंद्रुप-बराक-बांधकाम/ २४९/ २०१३, दिनांक १३.०१.२०१७.

**ज्ञापन :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस ठाणे, मंद्रुप, ता. पश्चिम सोलापूर, जि. सोलापूर, येथील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्याकरिता निवासी बराकी बांधण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी, उप अभियंता, दक्षिण सोलापूर (सार्वजनिक बांधकाम) उप-विभाग यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले **रु.४१,४८,४९९/-** इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.२१.८४ लक्ष** असे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे, पुढील अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

१) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुविशारदाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
२) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
४) बांधकाम करताना शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ या अनुसार कार्यवाही करण्यात यावी.
५) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये.

६) संबंधित कार्यकारी अभियंता आणि पोलीस अधीक्षक यांनी खर्चाचे अंदाज साक्षांकित करावे.

४. त्या अनुसार, पोलीस ठाणे, मंद्रुप, ता. पश्चिम सोलापूर, जि. सोलापूर, येथील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्याकरिता निवासी बराकी बांधण्याकरिता **रु.२१.८४ लक्ष** इतक्या खर्चाच्या अंदाजास, परिच्छेद ३ मध्ये नमूद केलेल्या अटींवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००)(११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे (४०७० ०२११), ५३, मोठी बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८२/इमा-२, दिनांक ०९.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८०२१५१५५६४७२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.08.02 15:16:31 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक,
महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
७) निवड फाईल (पोल-७).